**छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) [Chhatrapati Shahu Maharaj Research Training & Human Development Institute (SARATHI)] या संस्थेच्या आस्थापनेवर व्यवस्थापकीय संचालक नियमित स्वरूपाचे पद निर्माण करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- सीबीसी-२०१८/प्र.क्र.७१/मावक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना:-**

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था ( सारथी) या संस्थेची दि.२५ जून, २०१८ रोजी कंपनी अधिनियम २०१३ च्या कलम ८ अन्वये नोंदणीकरण करण्यात आली आहे. सारथी संस्था त्वरित कार्यान्वित करण्याकरिता सारथी संस्थेच्या आस्थापनेवरील व्यवस्थापकीय संचालक (१५६००-३९१००, ग्रेड पे ७६००/-), या स्वरूपाचे पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय - :**

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था ( सारथी) या संस्थेची दि.२५ जून, २०१८ रोजी कंपनी अधिनियम २०१३ च्या कलम ८ अन्वये नोंदणीकरण करण्यात आली आहे. सारथी संस्था त्वरित कार्यान्वित करण्याकरिता व्यवस्थापकीय संचालक (१५६००-३९१००, ग्रेड पे ७६००/-), हे पद निर्माण करण्यास या द्वारे मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्या-१२,दि.१७.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या तरतूदीचा अवलंब करुन सदर पद प्रतिनियुक्तीने भरण्यात येईल.

२. व्यवस्थापकीय संचालक हे पद सरळसेवेने अथवा प्रतिनियुक्तीने अथवा सेवानिवृत्तीच्या वेळी कमीतकमी उपरोक्त वेतनश्रेणी असणारा सेवानिवृत्त अधिकारी यामधून भरण्यात येईल.

३. वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.४१८/व्यय १४, दिनांक २३.१०.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र.६०७/आपुक, दि.२४.१०.२०१८ अन्वये चक्रीय पध्दतीने उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०११६५७३००९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2019.01.01 17:30:45 +05'30'

( दि.रा.डिंगळे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल याचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव

३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. मा.मंत्री (महसूल तथा अध्यक्ष, मराठा आरक्षणासंदर्भात गठीत मंत्रीमंडळ उपसमिती) यांचे खाजगी सचिव
९. मा. मंत्री /मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/(लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
११. आयुक्त, समाज कल्याण,पुणे
१२. महासंचालक,डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था बार्टी,पुणे
१३. सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
१४. सदस्य सचिव, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), बालचित्रवाणी, सेनापती बापट मार्ग.पुणे-४११००१
१५. कार्यासन आस्था-२, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती /मावक.